(सन २०१८-१९) करिता
**एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) या योजनेसाठी पुरवणी मागणीव्दारे मंजूर केलेल्या निधीपैकी ७० % निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.१६९/का.५**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ सप्टेंबर, २०१८

**वाचा :-** (१) वित्त विभाग,परिपत्रक क्र. पूरक-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दिनांक २७ जुलै, २०१८.

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) (लेखाशिर्ष २२३६ १९२७ व २२३६ १९३६) ही केंद्रपुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. या कार्यक्रमासाठी केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ५०:५० असे ठरविण्यात आलेले आहे.

सन २०१८-१९ या वर्षात राज्यातील १०४ नागरी व ४४९ ग्रामीण प्रकल्पातील ० ते ३ व ३ ते ६ वर्षातील बालके, कमी वजनाची बालके, गरोदर व स्तनदा माता या लाभार्थ्यांना गरम ताजा आहार व THR आहारावरील खर्चाकरीता सन २०१८ च्या दुस-या (पावसाळी) अधिवेशनात पुरवणी मागणीचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्यानुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) याखाली केंद्र हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६ १९२७) रु.२५०.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६ १९३६) रु. २५०.०० कोटी निधीच्या पुरवणी मागणीस विधानमंडळाने मंजूर दिली असल्याचे वित्त विभागाने उपरोक्त दिनांक २७ जुलै, २०१८ च्या परिपत्राकान्वये विभागाला कळविले आहे. त्यामुळे या योजनेकरीता मंजूर पुरवणी मागणीचा एकत्रित निधी ( केंद्र व राज्य हिस्सा रु.५००.०० कोटी) वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने तूर्तास वित्त विभागाने मंजूर पुरवणी मागणीच्या ७०% निधी वितरणास मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) याखाली केंद्र हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६ १९२७) रु.१७५.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६ १९३६) रु. १७५.०० कोटी असे **एकूण रु.३५०.०० कोटी** (अक्षरी तीनशे पन्नास कोटी फक्त) इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांना वितरीत करण्यास व खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे.

एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) (लेखाशिर्ष २२३६ १९२७ व २२३६ १९३६) ही केंद्रपुरस्कृत योजना राबविण्याबाबत केंद्र शासनाने वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार सन २०१८-१९ मध्ये केंद्र व राज्य हिश्याखाली मंजूर पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पित केलेल्या उपलब्ध तरतुदीतून वितरीत करावयाच्या व खर्च करावयाच्या निधीचा लेखाशिर्षनिहाय तपशील खालील प्रमाणे आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशिर्ष | सन २०१७ च्या हिवाळी अधिवेशनातील पुरवणी मागणीव्दारे उपलब्ध करुन देण्यात आलेला व आयुक्त,एकात्मिक बालविकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करावयाचा निधी. |
|---|---|
| २२३६ १९२७ **(केंद्र) ५०%** | १७५००.०० |
| २२३६१९३६ **(राज्य) ५०%** | १७५००.०० |
| **एकुण** | **३५०००.००** |

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९६/ व्यय ६, दिनांक ६.९.२०१८ नुसार प्राप्त झालेल्या मान्यतेच्या अधिन तसेच खालील अटींच्या अधिन राहून रु. ३५०.०० कोटी इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

"केंद्र शासनाकडे प्रलंबित निधी प्राप्त करण्याच्या दृष्टीने प्रयत्न करण्यात यावे."

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०७१६०९०६१८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vinita Ved Singal

Digitally signed by Vinita Ved Singal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bf34546cd1b83b57211a632b3065e76e8b0e2804e764de6b63b724785393c565, cn=Vinita Ved Singal
Date: 2018.09.07 17:34:25 +05'30'

**( विनिता वेद सिंगल )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानभवन,मुंबई.
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
४) सचिव (महिला व बालविकास विभाग), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई.
७) सर्व जिल्हाधिकारी.
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
९) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.

१०) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी .
११) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी ).
१२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
१३) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१७) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२)/ वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय, मुंबई
१८) कक्ष अधिकारी (का-४) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती (कार्यासन-५).

-----